**महाड शहर व महाड MIDC येथील पूर सौम्यीकरण उपाययोजनेअंतर्गत सावित्री नदी व तिच्या उपनद्या यांच्या गाळ उपसा खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०२५/प्र.क्र.७४/आव्यप्र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ३० मे, २०२५

**वाचा:-** जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिककरण, रायगड यांचे पत्र क्र. साशा/कार्या-१/ब-५/जि.आ.व्य.प्रा./सावित्री व इतर उपनद्यांमधील/ गाळ निष्कासन/ २०२५, दि. १३.०५.२०२५.

**प्रस्तावना**

महाड शहर व महाड MIDC क्षेत्रातील पूर परिस्थिती सौम्यीकरणासाठी सावित्री नदी व तीच्या उपनद्या पात्रातील गाळ निष्काषण कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांनी प्राधिकरणाच्या ठरावासह प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला होता.

यापूर्वी सदर नद्यांचा गाळ निष्काषण केल्यामुळे सावित्री नदीची पाणीपातळी ०.७५ मीटरने कमी झाल्याचे नमूद करून अतिवृष्टी होऊनही या भागामध्ये पूर परिस्थिती निर्माण झाली नाही असे जिल्हाधिकारी यांनी आपल्या प्रस्तावात नमूद केले आहे. यासाठी जिल्हाधिकारी यांनी पाठबंधारे विभाग, रायगड यांच्याकडून राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण (NDMA) च्या मार्गदर्शक तत्वानुसार सविस्तर प्रस्ताव घेतला असल्याचे नमूद केले आहे. त्यामध्ये अतिवृष्टीमुळे महाड शहर परिसरात उद्भवणारी पूर परिस्थितीची तिव्रता कमी करण्यासाठी सावित्री नदीतील गाळ निष्काषणासाठी रू.२०.०० कोटी इतक्या निधीची आवश्यकता असल्याचे कळविले आहे.

जिल्हाधिकारी यांनी सादर केलेल्या सदर पूर सौम्यीकरण उपाययोजना प्रयोजनार्थ येणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

जिल्हाधिकारी रायगड यांनी सादर केलेल्या महाड शहर व महाड MIDC येथील सावित्री नदी व तीच्या उपनद्यातील गाळ निष्काषण करण्यासाठी येणाऱ्या खर्चास खालील अटी व शर्तीच्या अधीन प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) जिल्हाधिकारी रायगड यानी सादर केलेल्या रू. २०.०० कोटी खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) सदर निधीमधून हाती घेण्यात येणाऱ्या कामांस जिल्हाधिकारी यांनी सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता घेऊन आपल्या स्तरावरून काम निहाय स्वतंत्र प्रशासकीय मान्यता देण्यात यावी.
३) सदर निधी ज्या प्रयोजनार्थ मंजूर करण्यात आलेला आहे, त्याच प्रयोजनावर खर्च करण्यात यावा.
४) सदर गाळ निष्काषण उपाययोजनेमुळे किती प्रमाणात पूर प्रतिबंधात्मक फायदा झाला यांची नोंद घेऊन शासनास अहवालसह अवगत करावे.
५) सदर प्रयोजनावर झालेल्या खर्चाचे काम निहाय उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्यात यावे.

२. या कामी होणारा खर्च मागणी क्र. सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ८० सर्वसाधारण (०१) (०१) महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाचे कार्यालय स्थापन करणे व फर्निचर व साधनसामुग्रीसह सुसज्जीकरण करणे (२२४५ १७६१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या उद्दीष्ठाखाली सन २०२५-२६ करिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौस क्र. ३१४/२०२५/ व्यय-९, दि.३०.०५.२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०५३०२०१९१३२०१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RATANSINGH MAHAJAN PARDESHI

Digitally signed by RATANSINGH MAHAJAN PARDESHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=8683c3d7b714d49dfd391ec34ab7bc6f1ab2319da73a07fba95b92f0d9ef34d4, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=591C4493A82FC9651507A70D7B02DFE21EC63AEEB741BB51922072AF1DF55D76, cn=RATANSINGH MAHAJAN PARDESHI
Date: 2025.05.30 20:19:55 +05'30'

**(रतनसिंह परदेशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-आवश्यक कार्यवाहीसाठी**

जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, रायगड.

**प्रत -**

१) अपर मुख्य सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२) संचालक, आपत्ती व्यवस्थापन यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३) वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
५) महालेखापाल (लेखापरिक्षा), मुंबई.
६) संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड.
८) निवड नस्ती, आव्यप्र-१.